**विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवर स्थानांतरीत करण्यात आलेल्या ७७ पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-३६१८/प्र.क्र. ६१/ पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२४

**वाचा:**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-३६१६/प्र.क्र.१६५/पोल-३,दि.०४.०३.२०१७.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.६१/पोल-३,दि. २४.०३.२०२१.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.६१/पोल-३,दि. ०७.०१०.२०२१.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.६१/पोल-३,दि. ३०.०३.२०२२.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.६१/पोल-३,दि. ३०.०९.२०२२.
६) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.६१/पोल-३,दि.०२.०३.२०२३.
७) शासन निर्णय, गृह विभाग क्र.संकीर्ण २०१५/प्र.क्र.११९/विशा-३ अ, दि.२८.०४.२०२३.
८) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३६२०/प्र.क्र.६८/पोल-३, दि.०५.०६.२०२३.
९) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.६१/पोल-३,दि.२२.०९.२०२३.
१०) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/ मुदतवाढ/सायबर/१०९ पदे/११/२०२२, दि.२३.०२.२०२४.
११) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.

## प्रस्तावना:-

नागरी संरक्षण संचालनालयातील १०९ पदे विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध,महाराष्ट्र राज्य,मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवर उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.०४.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे स्थानांतरीत करण्यात आली आहेत.

उपरोक्त संदर्भ क्र.६ येथील दि.०२.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवर स्थानांतरीत करण्यात आलेल्या उक्त १०९ पदांना दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली होती.

उपरोक्त संदर्भ क्र.८ येथील शासन निर्णय, गृह विभाग, दि.०५/०६/२०२३ अन्वये सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील अराजपत्रित गट ब व गट क संवर्गातील १०९

पदांपैकी एकूण ५२ पदे समर्पित करुन त्याऐवजी ५ पो. उप अधीक्षक व १५ पोलीस निरीक्षक अशी एकूण २० पदे निर्माण करण्याबाबत मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार उपरोक्त नमूद संदर्भ क्र.६ अन्वये मुदतवाढ देण्यात आलेल्या १०९ पदांपैकी उर्वरित ७७ पदांना संदर्भाधीन क्र.९ येथील दि.२२.०९.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता पोलीस महासंचालक कार्यालयाने संदर्भाधीन क्र.१० येथील पत्राद्वारे उक्त ७७ पदांना दि.०१.०३.२०२४ पासून पुढील मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे. यानुषंगाने शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवर स्थानांतरीत करण्यात आलेल्या ७७ अस्थायी पदांचा तपशील खालील तक्त्यात नमूद केलेला आहे.

| **अ.क्र.** | **पदाचे नाव** | **पदसंख्या** | **पदे निर्माण करण्यात आल्याचा शासन निर्णय क्र. व दि.** |
|---|---|---|---|
| १ | पोलीस अधीक्षक | १ | एपीओ-३६१६/ प्र.क्र.१६५/पोल-३, दि.४/३/२०१७ |
| २ | प्रशासकीय अधिकारी | १ | |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | ७ | |
| ४ | प्रमुख लिपीक | ४ | |
| ५ | उपलेखापाल | २ | |
| ६ | पोलीस हवालदार | ६ | |
| ७ | इलेक्ट्रीशियन | १ | |
| ८ | पोलीस नाईक | १ | |
| ९ | पोलीस शिपाई | ११ | |
| १० | कनिष्ठ लिपीक | १२ | |
| ११ | मदतनिस/सहा.स्वयंपाकी | २ | |
| १२ | शिपाई | ५ | |
| १३ | सफाईगार | २ | |
| १४ | माळी | १ | |
| १५ | स्वयंपाकी | १ | |
| १६ | पोलीस उप अधीक्षक | ५ | एपीओ-३६२०/ प्र.क्र.६८/पोल-३, दि.०५.०६.२०२३ |
| १७ | पोलीस निरीक्षक | १५ | |
| | **एकूण** | **७७** | |

२. उपरोक्त ७७ पदांना **दिनांक १ मार्च, २०२४ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच

पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

३. उपरोक्त पदांचा खर्च हा गृह विभाग, मागणी क्र."२०५५-पोलीस-०१, (००)(०६) सायबर व मअप्र(अनिवार्य)(२०५५ ए०२३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो **सन २०२४-२५** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१.०२.२०२४ व्दारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१३१७२०११९३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2024.03.13 17:46:52 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव(गृह),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
२. पोलीस महासंचालक , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. प्रधान सचिव(विशेष),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
४. संचालक,नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध,महाराष्ट्र राज्य,मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
१०. गृह विभाग, कार्यासन (बीयुडी-१/पोल-१/विशा-६).
११. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
१२. निवड नस्ती (पोल-३).